**<u>मुदतवाढ</u>**
**पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अपर पोलीस महासंचालक, नागरी हक्क संरक्षण या पदास मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांकः आयपीएस-१३१५/प्र.क्र.३२/पोल-१
मंत्रालय, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई -४०००३२.
तारीख: ३० मार्च, २०१५

<u>वाचा</u> :-

१) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-आयपीएस-१२०५/प्र.क्र.६०१/पोल-१, दिनांक ०३.०१.२००६.
२) शासन निर्णय,गृह विभाग, क्रमांक-आयपीएस-१२०५/प्र.क्र.३३२/पोल-१, दिनांक १०.०२.२०१२.
३) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-आयपीएस-१२०५/प्र.क्र.३३२/पोल-१, दिनांक १०.०२.२०१२.
४) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-आयपीएस-१२१२/प्र.क्र.१६८/पोल-१, दिनांक ०९.०४.२०१२.
५) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-भापोसे-१७१२/प्र.क्र.२९९/पोल-१, दिनांक - .०६.२०१२,
६) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-आयपीएस-१३१३/प्र.क्र.४५३/पोल-१, दिनांक २१.१०.२०१३,
७) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-आयपीएस-१३१४/प्र.क्र.११३/पोल-१, दिनांक १९.०३.२०१४,
८) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक पोमसं/२६-ब/ ६१४३/पोल-१ / अपोमस (नाहसं)/१३/२००६, दिनांक १६.१२.२०१४.

<u>प्रस्तावना</u> :-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदाच्या कामकाजाचा व्याप

वाढल्यामुळे, संदर्भ क्रं. १ येथील दिनांक ०३ जानेवारी, २००६ च्या शासन निर्णयान्वये या पदाची अपर पोलीस महासंचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई दर्जाच्या पदामध्ये प्रथमत: श्रेणीवाढ करण्यास मान्यता देण्यात आली होती. शासन निर्णय, गृह विभाग, दि.०५.१०.२०१० अन्वये सदर पदाची पुन्हा विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई अशी श्रेणीअवनत करण्यात आली. सदर अस्थायी पदास दिनांक २८.०२.२०१० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली.

तद्नंतर संदर्भ क्र.५ येथील दि. - जून २०१२ च्या शासन निर्णयान्वये या पदाची अपर पोलीस महासंचालक, नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई अशी श्रेणीवाढ करण्यात आली आहे. या पदास वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली असून संदर्भाधीन क्र. ७ येथील शासन निर्णयाद्वारे दि. ०१.०३.२०१४ ते २८.०२.२०१५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. सबब या पदास दि. २८.०२.२०१४ पासून पुढे मुदत वाढ द्यावयाची असल्याने, पोलीस महासंचालकांनी संदर्भ क्रमांक ८ अन्वये प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील अपर पोलीस महासंचालक, नागरी हक्क संरक्षण हे पद ज्या परिस्थितीत श्रेणीवाढ केले होते ती परिस्थिती अद्यापही कायम असून सदर अस्थायी पद सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नव्हते. सदर वस्तुस्थिती विचारात घेता, शासन आता खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे आस्थापनेवरील अपर पोलीस महासंचालक, नागरी संरक्षण या अस्थायी पदास दिनांक ०१.०३.२०१५ पासून दिनांक २९.०२.२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च, "२०५५-पोलीस-००१-संचालन व प्रशासन - पोलीस निरीक्षणालये" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो या लेखाशिर्षाखालील सन २०१५-१६ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्र.पदनि -२०१५/ प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०११३८५०७५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Devendra Chaudhary

Digitally signed by Charushila Devendra Chaudhary
DN: CN = Charushila Devendra Chaudhary, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.03.30 12:33:37 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक,नागरी हक्क संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा) - १, महाराष्ट्र, मुंबई,
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
६) गृह विभाग, कार्यासन (बीयुडी-१ / पोल-३ / विशा-६)
७) वित्त विभाग, ( कार्यासने व्यय-७ व वित्तीय सुधारणा-१) मंत्रालय, मुंबई.
८) निवड नस्ती (पोल-१)